**मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या सचिवांना**
**<u>सूचना देण्याबाबतची कार्यवाही.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१९/प्र.क्र.३५/१८(र.वका.)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२
दिनांक : २४ सप्टेंबर, २०२०.

**<u>शासन परिपत्रक:-</u>**

या विभागाच्या असे निदर्शनास आले आहे की, मंत्रालयीन विविध विभागांकडून त्यांचे विभागाशी संबंधित विषयासंबंधी इतर मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील सचिवांना सूचना द्यावयाच्या असल्यास अशा बाबींकरीता सामान्य प्रशासन विभागाच्या रचना व कार्यपद्धती (कार्यासन-१८) कार्यासनास विनंती करण्यात येत असते. महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीतील नियम-१४ अनुसार विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव हे त्यांचे विभागाशी संबंधित विषयासंबंधीच्या प्रत्येक प्रकरणात शासन कार्यनियमावलीचे पालन करण्यास जबाबदार व सक्षम आहेत. याशिवाय शासन कार्यनियमावलीच्या पहिल्या अनुसूचीन्वये सामान्य प्रशासन विभागास नेमून दिलेल्या विषयांमध्ये सर्व मंत्रालयीन विभागांना सूचना देण्याबाबतच्या कोणत्याही विषयाचा समावेश नाही. मात्र काही अपवादात्मक व तातडीच्या प्रकरणी सर्व विभागांना सूचना देण्याबाबत या विभागाकडून सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. परिणामी सामान्य प्रशासन विभागानेच प्रत्येक प्रकरणी सूचना निर्गमित करण्याची विभागांनी मागणी करणे उचित नाही.

२. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या निदर्शनास आणण्यात येते की, शासन कार्यनियमावलीच्या नियम-१४ मधील तरतूदीस अनुसरुन प्रत्येक विभागाशी संबंधित विषयासंदर्भात सर्व विभागांना सूचना देण्यासाठी संबंधित विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव हे सक्षम असल्याने (उ.दा. विधानमंडळ व विधानमंडळाच्या विविध समित्यांविषयक कामकाज - संसदीय कार्य विभाग, लोकलेखा समिती / सार्वजनिक उपक्रम समितीविषयक कामकाज - वित्त विभाग, ज्येष्ठ नागरीक धोरण- सामाजिक न्याय विभाग, वृक्षारोपणाविषयी अभियान-वन विभाग इ.) अशा प्रत्येक विभागाने त्यांचे विभागाशी संबंधित विषयाबाबत इतर विभागांना काही सूचना द्यावयाच्या असल्यास, अशा सूचना संबंधित विभागाचे स्तरावर देण्यात याव्यात. यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या रचना व कार्यपद्धती विभागाकडे संदर्भ करण्यात येऊ नये.

३. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२००९२५१७२७४५६४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHRIKANT M DESHPANDE

Digitally signed by SHRIKANT M DESHPANDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=ALL INDIA SERVICES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fbe6817f24737bd4bc10f54ce9890a85094b471dfa59ad241b9368f0fa7bc5ee, serialNumber=2f6f50e472d07b6d0a7dafbb9041ea434ee8354747392652dc252e4ec6b05ad1, cn=SHRIKANT M DESHPANDE
Date: 2020.09.25 17:27:26 +05'30'

**( श्रीकांत देशपांडे )**

**प्रधान सचिव (प्र.सु.र.व का.)**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती),
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव(५ प्रती), मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१०. सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
११. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती ),
१३. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई ४०००२०.
१४. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
१५. नॅशनलीस्ट काँग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ४०००३८.
१६. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.
१७. बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, प्लॉट नं. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०००१४.

१८. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४००००४.

१९. भारतीय कम्युनिस्ट(मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०००१३.

२०. महाराष्ट्र नवनिर्माण सेवा, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०००२८,

२१. निवड नस्ती (का.१८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.